रोजगार व स्वयंरोजगार निर्मिती रोजगार व स्वयंरोजगार अम्मलबजावणी समित्यांची पुनर्रचना

महाराष्ट्र शासन
रोजगार व स्वयंरोजगार विभाग
शासन निर्णय क्रमांकः इएसई २०००/प्र.क्र.२१२/रोस्वरो-१,
नवीन प्रशासकीय इमारत, १४वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांकः २३ ऑक्टोबर, २००१

वाचा:- १) सामान्य प्रशासन विभाग अधिसुचना क्रमांक शाकानि.१०९७/प्र.क्र.२१/ १८ (र.व.का), दिनांक ११ जून, १९९७.
२) शासन निर्णय रोजगार व स्वयंरोजगार विभाग क्रमांकः इएसई -१०९७ प्र.क.३१४/रोस्वरो-१, दिनांक १४ ऑगस्ट १९९७.
३) शासन निर्णय, रोजगार व स्वयंरोजगार विभाग क्रमांकः इएसई -२०००/प्र.क्र.२१२/रोस्वरो-१, दिनांकः ८ मार्च, २००१
४) शासन शुद्दीपत्रक, रोजगार व स्वयंरोजगार विभाग क्रमांकः इएसई २०००/प्र.क्र.२१२/रोस्वरो-१, दिनांकः ०९ मे, २००१

**शासन निर्णयः-**

महाराष्ट्र राज्याच्या रोजगार व स्वयंरोजगाराचे नवीन धोरण २४ ऑगस्ट २००० रोजी जाहीर करण्यात आले आहे. सदर धोरणानुसार रोजगार व स्वयंरोजगार निर्मितीसाठी शासनाच्या विविध योजनांतर्गत लाभार्थ्यांची योग्यप्रकारे निवड व योजनांची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी जिल्हा स्तरावर व उपविभागीय स्तरावर उपरोक्त संदर्भ क्र.३ व ४ अन्वये रोजगार व स्वयंरोजगार समित्या स्थापन करण्यात आल्या आहेत. सदरहू आदेश अधिक्रमित करून शासनाने या समित्यांच्या पुनर्रचनेचा निर्णय घेतला आहे.

२. महाराष्ट्रातील बेकारीचा प्रश्न ही एक जटील, ज्वलंत समस्या बनली आहे. सदर प्रश्नाची तीव्रता कमी करण्यासाठी रोजगार व स्वयंरोजगाराच्या संधी उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. अशा प्रकारच्या संधीचा फायदा घेण्यासाठी योग्य लाभार्थ्यांची, व्यवसायांची निवड, आवश्यक प्रशिक्षण, सुलभरितीने पतपुरवठा, कर्जाची परतफेड, पणन इत्यादी सर्व बाबींची माहिती तसेच मार्गदर्शन लाभार्थ्यांस मिळणे आवश्यक आहे. शासन स्वयंरोजगार निर्मितीच्या राज्य योजने अंतर्गत तथा केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत अनेक योजना राबवित आहे. या योजना शासनाच्या संबंधित विभागांकडून कार्यान्वित केल्या जात आहेत. या सर्व योजनांचा तसेच संबंधित विभागांचे अधिकारी यामध्ये समन्वय असणे आवश्यक आहे. असा समन्वय घडवून आणण्यासाठी व शासनाने रोजगार व स्वयंरोजगाराबाबत आखलेल्या धोरणाची प्रभावी अंमलबजावणी करण्याचे दृष्टीने शासन उपविभागीय स्तरावर खालील प्रमाणे उप

Gmit GR/24-Oct-01
एच ७३१ (१५००-१०-०१)२

GR- 200201211748 22000 - 2600

जिल्हाधिकारी/प्रांत अधिकारी यांचे अध्यक्षतेखाली रोजगार व स्वयंरोजगार उप विभागीय समिती नियुक्त करीत आहे :-

| | |
|---|---|
| १. उपजिल्हाधिकारी/प्रांत अधिकारी | अध्यक्ष |
| २. संबंधित उपविभागातील सर्व विधान सभा /विधान परिषद सदस्य | सदस्य |
| ३. सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था | सदस्य |
| ४. जिल्हा अग्रणी बँक व अन्य संबंधित बँकांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ५. प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास विभाग | सदस्य |
| ६. स्वयंरोजगार निर्मितीच्या योजना कार्यान्वीत करणारे संबंधित विभागांचे उप विभागीय स्तरावरील अधिकारी. | सदस्य |
| ७. उपविभागीय क्षेत्रात रोजगार निर्मितीस पोषक क्षेत्रात कार्यरत असलेल्या स्वयंसेवी संस्थांचे प्रतिनिधी (दोन) | सदस्य |
| ८. रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी, (कनिष्ठ स्तर) | निमंत्रक-सदस्य सचिव |

३. उपविभागीय स्तरावर रोजगार व स्वयंरोजगार निर्मिती करणा-या सर्व योजनांच्या अंमलबजावणीचा आढावा घेणे, स्वयंरोजगारासाठी लाभार्थ्यांची शास्त्रोक्त पध्दतीने समर्पक निवड करण्याबाबत योग्य काळजी घेणे, लाभार्थ्यांना स्वयंरोजगारासाठी सुलभरितीने पतपुरवठा उपलब्ध होईल व स्वयंरोजगाराचा व्यवसाय यशस्वीपणे कार्यान्वित होईल, असे पहाणे, पतपुरवठा करणा-या विविध वित्तिय संस्था तथा लाभार्थी यामध्ये समन्वय घडवून आणाणे, वित्तीय संस्थांकडून ना-हरकत प्रमाणपत्र मिळविण्यात घेण्यात येत असलेल्या अडचणी दूर करणे व स्वयंरोजगाराकरिता लाभार्थ्यांना देण्यात आलेल्या कर्जाची परतफेड वेळेवर व व्यवस्थित होईल यादृष्टीने उपाययोजना करणे इत्यादी उपरोक्त उप विभागीय समितीचे प्रमुख कार्य राहील.

ही समिती आवश्यकतेनुसार विविध क्षेत्रामध्ये कार्यरत असलेल्या स्वयंसेवी संस्थांच्या प्रतिनिधींना त्यांचे बैठकीस निमंत्रित करु शकेल.

या समितीची बैठक दरमहिन्यातून किमान एकदा घेण्यात येईल व या बैठकांची इतिवृत्ते/ कार्यवृत्त व अनुषंगीक अनुपालन अहवाल ही समिती रोजगार व स्वयंरोजगार जिल्हास्तरीय समितीस सादर करील. आवश्यकतेनुसार एका महिन्यात एकापेक्षा जास्त वेळा बैठका बोलाविण्याचा अधिकार अध्यक्षांना राहील.

४ रोजगार व स्वयंरोजगार उप विभागीय समितीचे कार्यास मार्गदर्शन करण्यासाठी तसेच त्यांनी केलेल्या कार्याचा आढावा घेण्यासाठी जिल्हास्तरावर देखील मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे रोजगार व स्वयंरोजगार जिल्हास्तरीय समिती स्थापन करण्यास शासन मान्यता देत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १. | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | अध्यक्ष |
| २. | अतिरिक्त जिल्हाधिकारी | उपाध्यक्ष |
| ३. | अप्पर आयुक्त, आदिवासी विकास विभाग | सदस्य |
| ४. | जिल्ह्यातील सर्व लोक सभा, विधान सभा/ विधान परिषद सदस्य | सदस्य |
| ५. | अध्यक्ष, नगरपालिका/नगरपरिषदा | सदस्य |
| ६. | अध्यक्ष, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक | सदस्य |
| ७. | जिल्हा अग्रणी बँक व जिल्ह्यातील अन्य संबधित बँकांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ८. | उपनिबंधक, सहकारी संस्था | सदस्य |
| ९. | स्वयंसेवी संस्थाचे जिल्हा प्रतिनिधी (तीन) | सदस्य |
| १०. | प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास विभाग | सदस्य |
| ११. | स्वयंरोजगार निर्मितीच्या योजना कार्यान्वीत करणारे संबंधित विभागांचे जिल्हास्तरावरील अधिकारी. | सदस्य |
| १२. | सहाय्यक संचालक (वर्ग-१), रोजगार व स्वयंरोजगार | निमंत्रक -सदस्य सचिव |

५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या अध्यक्षतेखाली नियुक्त करण्यात आलेली उपरोक्त रोजगार व स्वयंरोजगार जिल्हास्तरीय समिती, उपविभागीय समितीने त्यांचेकडे सादर केलेल्या त्यांच्या बैठकीचे इतिवृत्त/कार्यवृत्त, अनुपालन अहवाल इत्यादीवर विचार विमर्श करुन लाभार्थ्यांना शासनाचे विविध योजनांचे लाभ योग्य प्रकारे मिळतात किंवा कसे याची खातरजमा करेल तसेच विविध विभागांमध्ये समन्वयाचा अभाव आढळल्यास समन्वय साधण्याचे दृष्टोने आवश्यक असलेले, योग्य असे धोरणात्मक निर्णय घेईल किंबहुना लाभार्थ्यांना करावयाचा पतपुरवठा वा त्यांनी करावयाची कर्जाची परतफेड या बाबतीतही आवश्यक ती पाऊले उचलण्यास सक्षम राहील.

मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली नियुक्त केलेल्या या समितीची बैठक दर दोन महिन्यातून किमान एकवेळ आयोजित करण्यात येईल व या बैठकीचे इतिवृत्त व अहवाल शासनास पाठविण्यात येईल.

६. उपविभागीय समितीच्या बैठका प्रांत अधिकारी यांच्या कार्यलयात अथवा त्या उपविभागातील त्यांना सोईच्या ठिकाणी घेण्यात येतील. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या अध्यक्षतेखालील समितीच्या बैठका त्यांच्या कार्यालयात जिल्ह्याच्या ठिकाणी आयोजित करण्यात येतील.

७. समितीवर नियुक्त करावयाच्या स्वयंसेवी संस्थांची निवड संबधित उपविभागीय/जिल्हा समिती करेल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( प्र. ल. भदे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रतिः

मा.राज्यपालांचे सचिव

एच ७३३ (१५००-१०-०१)-२
Dewi GR/24-Oct-01

GR-200201211748 22000-2600

मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
मा. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
सर्व लोकसभा सदस्य (महाराष्ट्र राज्यातील)
सर्व विधानसभा सदस्य
सर्व विधान परिषद सदस्य
मा. मुख्य सचिव
मा. सल्लागार, रोजगार व स्वयंरोजगार
प्रधान सचिव, महसूल व वन विभाग
प्रधान सचिव, नगर विकास विभाग
सचिव (सहकार) सहकार व वस्त्रोद्योग विभाग
सचिव, ग्रामविकास विभाग
सचिव, आदिवासी विकास विभाग
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
मंत्रालयीन विभागांचे अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
सर्व विभागीय महसूल आयुक्त
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १, मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र २ नागपूर
महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १, मुंबई
महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र २, नागपूर
अधिदान व लेखाधिकारी मुंबई
सर्व जिल्हा कोषागार/उप कोषागार अधिकारी
निवासी लेखा परीक्षा अधिकारी,
आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
सर्व जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार, विभागीय उपसंचालक व मार्गदर्शन अधिकारी.
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व अतिरिक्त जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद
सर्व उपविभागीय अधिकारी (जिल्हाधिकारी यांचेमार्फत)
सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,
सर्व जिल्हा व्यवसाय मार्गदर्शन अधिकारी,
सर्व व्यवस्थापक जिल्हा उद्योग केंद्र,
रोस्वरो विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती.रोस्वरो-१

—२—

एच (७३) (१५०० - १० - ०१) २३



GR-20020121174822000-2600